सन २०१४-१५ करिता संचालन व प्रशासन अंतर्गत सामूहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड,ता.डहाणू, जि.ठाणे यांचे ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) अनुदानास वित्तीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः साकृप्र २०१४/ प्र.क्र.२०७/का.३ अे
मंत्रालय विस्तार,मुंबई.४०० ०३२
दिनांक- २८.१.२०१५

वाचा -

१.कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. साकृप्र २०१४/ प्र.क्र.२०७/का.३ अे, दिनांक २४.११.२०१४

२.वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अंदाज-२०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.२ जानेवारी,२०१५.

प्रस्तावना:-

राज्यातील शेतक-यांना विशेषत: आदिवासी शेतक-यांना नविन शेती तंत्रज्ञानाचा तसेच शेतीशी संलग्न दुग्धव्यवसाय,कुक्कुटपालन इ. विषयासंबंधी प्रशिक्षणाद्वारे माहिती व तंत्रज्ञान अवगत करुन देण्याच्या उद्देशाने ठाणे जिल्हयात सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल हे केंद्र कार्यरत आहे. या संस्थेमार्फत सुरु असलेल्या कार्याचा आणि उपलब्ध सोयी सुविधांचा आदिवासी स्त्री-पुरुष शेतक-यांना चांगला लाभ होत असल्याचा अनुभव आल्यामुळे शासनाने सन १९७५ पासून कोसबाड येथील सामुहिक प्रशिक्षण केंद्र ही योजना १०० टक्के अनुदान तत्वावर गोखले एज्युकेशन संस्थेकडे सुपूर्द केली आहे.

२. गोखले एज्युकेशन संस्थेच्या सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे केंद्राच्या वेतनेत्तर प्रतिपूर्तीसाठी सन २०१४-१५ या वर्षात ३६-सहाय्यक अनुदान (वेतन) अंतर्गत रुपये २५२९.०० हजार एवढी तरतुद करण्यात आली आहे. सदरहू कार्यक्रमास तसेच प्रस्तुत अर्थसंकल्पाच्या एकंदरीत ६०% मर्यादित रु.१५१७.०० हजार इतक्या निधीस प्रशासकीय/वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. आता वित्त विभागाच्या दि.२ जानेवारी ,२०१५ च्या परिपत्रकानुसार जानेवारी २०१५ ते मार्च २०१५ या तिमाहीकरिता ०१ वेतन या लेखाशिर्षाखाली एकूण मंजूर तरतूदीच्या ४०% च्या मर्यादेत (यापूर्वी वितरीत करण्यात आलेले ६०% म्हणजेच रु.१५१७.०० हजार इतका निधी वगळता) उर्वरीत तिमाही करीता रु.१०११.६० हजार इतक्या निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

गोखले एज्युकेशन संस्थेच्या सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणेसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी ३६, सहाय्यक अनुदान (वेतन) या बाबीखाली वित्त विभागाच्या दि.२ जानेवारी, २०१५ च्या परिपत्रकानुसार करण्यात आलेल्या सूचनेनुसार एकूण मंजूर तरतूदीच्या ४०% च्या मर्यादेत (यापूर्वी वितरीत करण्यात आलेले ६०% म्हणजेच रु.१५१७.४० हजार इतका निधी वगळता) उर्वरीत तिमाहीकरिता रु.१०११.६० हजार इतक्या निधीस वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. याप्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१४-१५ मध्ये मंजूर केलेल्या अनुदानातून खालील लेखाशिर्षाखाली करण्यात यावा.

मागणी क्रमांक - डी-३
२४०१-पीक संवर्धन
००१-संचालन व प्रशासन
(००)(०१)कृषि आयुक्तालय
(२४०१ ०१३६)
३६-सहाय्यक अनुदान (वेतन)

मंजुर निधी खर्च करतांना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे/ प्रक्रियेचे अवलंबून / वित्तीय अधिकाऱ्याच्या मर्यादेत, सार्वजनि बाधकाम विभागाच्या मॅन्युअलचे अधिन राहून / सी.व्हि.सी. च्या मार्गदर्शक तत्वानुसार/सी.ए.जी.च्या निर्देशानुसार / प्रचलित शासन निर्णयानुसार / नियम /परिपत्रक/ तरतुदीनुसार/बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे क्र.अंदाज-२०१३/ प्र.क्र.८५ / अर्थसंकल्प-३,दि.२.१.२०१५ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार तसेच मा.अ.मु.स. (कृषि) यांच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१२८१७०३४५२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Borkar Vidyadhar M

Digitally signed by Borkar Vidyadhar M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Borkar Vidyadhar M
Date: 2015.01.28 17:12:53 +05'30'

**(वि.म.बोरकर)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त,(कृषि) कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
२) संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
३) सर्व मा. विधानमंडळ सदस्य.
४) विभागीय कृषि सहसंचालक,कोकण विभाग,ठाणे
५) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,ठाणे जिल्हा,ठाणे
६) जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण विभाग,जिल्हा ठाणे
७) महालेखापाल १/२(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
८) विभागीय आयुक्त,कोकण भवन,नवी मुंबई

९) मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.ठाणे
१०) वित्त विभाग (व्यय-१) (अर्थसंकल्प-१२)(अर्थोपाय),मंत्रालय,मुंबई.३२
११) कार्यासन अधिकारी,२- अे,१५-अे,१६-अे,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२) प्रशिक्षण अधिकारी,सामुहिक कृषक प्रशिक्षण केंद्र,गोखले एज्युकेशन सोसायटी,
१३) कोसबाड हिल,तालुका डहाणू जि.ठाणे
१४) निवड नस्ती का-३अे